**मोरा, उरण, जि. रायगड येथे रो-रो जेट्टी तत्सम सुविधा निर्माण करणे या कामाकरती रू.८८.७२ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकिय मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमआयएस ०९२१/प्र.क्र.७७/बंदरे-२

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-** १. शासन निर्णय क्रमांकः एमआयएस ०८१८/प्र.क्र.१४०/बंदरे-२ गृह विभाग, दि. २३ जानेवारी, २०१९

२. केंद्रीय बंदरे, जहाज व जल परिवहन मंत्रालय यांचे पत्र क्र. P२-२५०२१/९/२०१८-SM दि. ६ ऑगस्ट २०२१

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ/अभि-३/मोरा रो रो जेट्टी/२०२१-२२/३४५६, दिनांक २४.०८.२०२१

**प्रस्तावना:**

रायगड जिल्हयातील उरण हे तालुक्याचे ठिकाण असून या ठिकाणाचा विकास झपाटयाने होत आहे. उरण येथून मुंबईकडे कामानिमित्त ये-जा करणारे असंख्य प्रवाशी आहेत. उरण ते मुंबई हे अंतर रस्तामार्गे साधारणत: ७० कि.मी आहे. त्यासाठी जवळपास दीड ते दोन तासांचा कालावधी लागतो. तर भाऊचा धक्का (मुंबई) ते मोरा बंदर (उरण) जलमार्गाचे अंतर ५.३० नॉटिकल मैल असून जलमार्ग प्रवास केल्यास त्यास साधारणत: अर्धा तासाचा कालावधी लागतो. सदयस्थितीत मोरा ते भाऊचा धक्का अशी बारमाही जलवाहतूक सेवा सुरु आहे. तथापि, या जलवाहतुकीमार्गे प्रवाशांना त्यांची वाहने बोटीत चढवून नेता येत नाही. त्यामुळे त्यांना नाईलाजास्तव रस्तामार्गे वाहनाने प्रवास करावा लागतो. भाऊचा धक्का ते मोरा अशी रो-रो सेवा चालू केल्यास प्रवाशांना त्यांची वाहने जलमार्गाने नेता येतील. त्यामुळे इंधनाची बचत होऊन कमी वेळेत प्रवास करता येईल. तसेच रस्ते वाहतुकीवरील ताण देखील कमी होण्यास मदत होणार आहे. मोरा, ता. उरण, जि. रायगड येथे रो-रो जेट्टी व तत्सम सुविधा निर्माण करणे या कामाकरिता संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीच सागरमाला कार्यक्रमांतर्गत ५० टक्के केंद्र शासन व ५० टक्के राज्य शासन याप्रमाणात रुपये ६५,३९,८४,९०९/- इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्यापैकी रुपये रु. ६१.३१ कोटी इतक्या रक्कमेस केंद्र शासनाने संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे.

सदरचा मूळ प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव हा सन २०१७-१८ च्या दर सूचीनुसार तयार करण्यात आला होता. आता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने किंमतीमध्ये वाढ झाल्याने सन २०२१-२२ च्या दर सूचीनुसार खालीलप्रमाणे रु.८८,७१,७८,४२९/- एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय:**

मोरा, उरण, जि. रायगड येथे रो-रो जेट्टी व तत्सम सुविधा निर्माण करण्यासाठीच्या कामांना, सागरमाला कार्यक्रमांतर्गत खालील तक्त्यात दर्शविलेल्या रकमेच्या मर्यादेत प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामांचे स्वरुप | अंदाजपत्रकिय किंमत |
|---|---|---|
| | Part A | |
| १ | Approach Jetty | रु.१९,०५,१७,६३४.५६ |
| २ | Turning Platform | रु.५,८७,४१,३७६.७८ |
| ३ | Moorning Dolphine | रु.५,२९,२९,५८३.२८ |
| ४ | Floating Pontoon and linkspan assembly (including Cathodic Protection) | रु.९,४८,७५,०००.०० |
| ५ | Bollards and Fenders | रु.१४,०३,०९६.६० |
| ६ | Parking Platform | रु.१२,८७,३८,६२१.३१ |
| ७ | Terminal Building (Including Liaisoning ) | रु.४,४३,७७,६९७.१८ |
| ८ | Water Tank and other external Services | रु. २४,४२,५४६.०० |
| ९ | Electrification Work | रु. ३,६३,३७,५०१.६८ |
| १० | Dredging | रु.१०,६३,४२,७२५.०० |
| ११ | RCC Steps for Passanger Jetty | रु.६८,१७,२४०.०० |
| | **Total A** | **रु.७२,३५,२३,०२२.३९** |
| | Part B | |
| १२ | Material Testing | रु. ७,८८,८६०.०० |
| a | Royaltly for Sand | रु.१६,१९,२८५.९२ |
| b | Royaltly for Rubble | रु. ३३,३८,१००.२३ |
| c | Royaltly for Murum | रु.९५,८६,९४०.९५ |
| | **Total Material Testing + Royalty** | **रु.१,५३,३३,१८७.१०** |
| | Add ०.५% Labour Insurance (on Part A) | रु.३६,१७,६१५.०० |
| | Add १२% GST (on Part A) | रु.८,६८,२२,७६३.०० |
| | **Total B** | **रु.१०,५७,७३,५६५.१०** |
| | Add ४% PMC Charges (on Part A) | रु.२,८९,४०,९२१.०० |
| | ४% Contigency | रु.२,८९,४०,९२१.०० |
| | **Total Cost** | **रु.८८,७१,७८,४२९.४९** |
| | **Total Cost Round up** | **रु.८८,७१,७८,४२९.००** |

२. सदर सुधारित प्रशासकिय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i) वरील कामांचे रू. **८८,७१,७८,४२९.००/-** इतक्या रकमेचे अंदाजपत्रक विहीत मार्गाने केंद्र शासनास, केंद्र हिश्श्याचा ५०% निधी मिळण्याकरीता सादर करावे.

ii) सदर कामांना पर्यावरण तसेच इतर अनुषंगीक विभागांच्या आवश्यक परवानग्या घेण्यात याव्या.

iii) वरील कामांवरिल खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृह ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०३) जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (राज्य हिस्सा ५०%) (३०५१ १८९१), ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या लेखाशिर्षाखाली मंजुर तरतुदीतून भागविण्यात येईल.

iv). सदर शासन निर्णय केंद्र शासनाच्या सागरमाला कार्यक्रमास मान्यता देणेबाबतच्या मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९.०९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार आणि सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६/रा.म.-२ दि. २७/०९/२०२१, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौ.सं.१२६/का.१४६१, दिनांक २६.११.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५११/२०२१/व्यय-८, दिनांक ०७.१२.२०२१ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१७१६४३०१२७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2022.02.18 16:57:01 +05'30'

**(रा. मो. होळकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव,
२. मा. राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव,
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (परिवहन व बंदरे), मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती (बंदरे-२)